**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन योजना (SHM) सन २०२०-२१ मध्ये राबविण्यासाठी निधी वितरण**

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: योजना ३३२०/प्र.क्र.७२/१अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा :-**

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन (SHM) बाबतच्या मार्गदर्शक सूचना.

२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक १४-३/२०१८-Fert.Use Cell, दिनांक १६.०५.२०१८.

३) केंद्र शासनाचे निधी वाटपाबाबतचे पत्र क्र. No.14-20/2014 Fert. Use Cell, दिनांक २१.०२.२०१९.

४) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक कृआ/मृसमृचा/जआव्य/निधी वितरण/२४९/२०१९, दिनांक २५.०२.२०१९.

५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना ३३१९/प्र.क्र.२६/१अे, दिनांक ०२.०३.२०१९.

६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना ३३१९/प्र.क्र.२६/१अे, दिनांक २६.०३.२०१९.

७) केंद्र शासनाचे पत्र क्र.२-१/२०१९ Fert Use, दिनांक १२.०४.२०१९ रोजीचे पत्र.

८) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक कृआ/मृसमृचा/जआव्य/ निधी वितरण/१५८४८/२०२०, दिनांक ०६.०७.२०२०.

९) केंद्र शासनाचे पत्र क्र.२-१/२०२० Fert Use, दिनांक १४.०५.२०२०.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन (SHM) ही केंद्र पुरस्कृत योजना सन २०१४-१५ पासून राबविण्यात येत आहे. सन २०१५-१६ पासून सदर योजना केंद्र व राज्य हिस्सा ६०: ४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत फिरती/ स्थायी मृद चाचणी प्रयोगशाळेची उभारणी करणे, शासकीय मृद चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे, खत नियंत्रण चाचणी प्रयोगशाळांचे बळकटीकरण करणे इत्यादी घटक राबविण्यात येतात.

मृद आरोग्य व्यवस्थापन योजना राज्यात सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरीता केंद्र शासनाने एकूण रू.७७५.२० लाख रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास मंजूरी दिलेली आहे. यामध्ये केंद्र हिस्सा (६०%) रू.४६५.१२ लाख इतका असून राज्य हिस्सा (४०%) रू.३१०.०८ लाख इतका येत आहे.

## जमीन आरोग्य व्यवस्थापन योजना सन २०१८-१९ मंजूर वार्षिक कृति आराखडा (रु.लाखात)

| अ.क्र. | बाबींचे नाव | भौतिक | आर्थिक | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०% | |
| १ | मृद विश्लेषण प्रयोगशाळेचे बळकटीकरण रु.४०.००लाख प्रति प्रयोगशाळा | ३१ | ३३६.०० | २२४.०० | ५६०.०० |
| २ | खत चाचणी प्रयोगशाळेचे बळकटीकरण रु.४०.०० लाख प्रति प्रयोगशाळा | ०५ | १२०.०० | ८०.०० | २००.०० |
| ३ | अभियान व्यवस्थापन (२%) | -- | ९.१२ | ६.०८ | १५.२० |
| | **एकूण** | | **४६५.१२** | **३१०.०८** | **७७५.२०** |

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन योजना (SHM) राबविण्यासाठी दि. ०२.०३.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

केंद्र शासनाने दिनांक २१.०२.२०१९ च्या पत्रान्वये सदर योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरीता रू.११६.२८ लाख इतका पहिला हप्ता वितरीत केला होता. त्यानुसार शासन निर्णय दि.२६.०३.२०१९ अन्वये केंद्र हिस्सा रु.११६.२८ लाख व राज्य हिस्सा रु.७७.५२ लाख निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली होती. केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक १२.०४.२०१९ रोजीच्या पत्रान्वये सन २०१८-१९ मधील केंद्र हिश्श्यातील अखर्चित निधी रुपये ३२.२८ लाख इतका निधी पुनर्जिवीत करुन खर्च करण्यास परवानगी दिलेली होती. त्यानुसार केंद्र हिश्श्यातील रुपये ३२.२८ लाख इतका निधी, तसेच राज्य हिश्शातील रुपये २१.५० लाख इतका अखर्चित निधी खर्च करण्यास शासन निर्णय दि.०६.०८.२०१९ अन्वये मान्यता देण्यात आलेली होती.

केंद्र शासनाने सदर योजनेच्या सन २०१८-१९ करीता मंजूर निधी पैकी उर्वरित निधी म्हणजेच रु.३४८.८४ लाख, सन २०१९-२० मध्ये वितरीत केलेला आहे. सदरचा केंद्र हिस्सा निधी राज्य हिश्यासह मार्च अखेर न वितरीत झाल्याने सदरची रक्कम केंद्र शासनाकडून दिनांक १४.०५.२०२० च्या पत्रान्वये पुर्नजिवीत करुन सन २०२०-२१ मध्ये खर्च करण्यास मंजूरी दिलेली असल्याचे कृषि आयुक्तालयाने कळविलेले आहे. सद्यस्थितीत शासकीय मृद तपासणी प्रयोगशाळा व शासकीय खत चाचणी प्रयोगशाळांमधील साहित्य उपकरणांच्या दुरुस्ती, देखभाल व मनुष्यबळ विकासा इ. साठी निधीची अत्यंत आवश्यकता भासत असल्याने व उपरोक्त बळकटीकरणाकरीता केंद्र शासनाकडून प्राप्त व पुर्नजिवीत झालेल्या एकूण रू. ३४८.८४ लाख इतक्या रकमेतून केंद्र हिश्श्याचा रु. १४८.७२ लाख व त्यास अनुसरून राज्य हिश्श्याचा रु. ९९.१४ लाख असा एकूण रु. २४७.८६ लाख सन २०२०-२१ मध्ये प्रथम टप्प्यात उपलब्ध करून देण्याची विनंती संदर्भ क्र.८ वरील पत्रान्वये कृषि आयुक्तालयाने केलेली आहे. **वित्त विभागाने राज्य हिश्श्यापोटी उपलब्ध असलेल्या तरतुदीच्या ३० टक्केच्या मर्यादेत म्हणजे रू. ६०.०० लाख इतका राज्य हिश्श्याचा निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.** त्यास अनुसरून केंद्र हिस्सा रू. ९०.०० लाख

इतका येत आहे. त्यानुसार **केंद्र हिश्श्याचा रु.९०.०० लाख व राज्य हिश्श्याचा रु. ६०.०० लाख असा एकूण रु.१५०.०० लाख** निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) मृद आरोग्य व्यवस्थापन (SHM) ही केंद्र पुरस्कृत योजना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात राज्यामध्ये राबविण्याकरीता केंद्र शासनाकडून प्राप्त व पुर्नजिवीत झालेल्या एकूण रू.३४८.८४ लाख इतक्या रकमेतून प्रथम टप्प्यात **केंद्र हिश्श्याचा रु.९०.०० लाख व राज्य हिश्श्याचा रु. ६०.०० लाख असा एकूण रु.१५०.०० लाख** निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेकरिता होणारा खर्च सन २०१९-२० करीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षखाली टाकण्यात यावा.

**केंद्र हिस्सा लेखाशिर्ष**

मागणी क्र.डी-३
२४०२, मृद व जलसंधारण
(००)(१०१) मृद सर्वेक्षण व चाचणी
(००)(१३) कृषि उन्नती योजना - मृद आरोग्य व्यवस्थापन-उपअभियान (केंद्र पुरस्कृत योजना)
(केंद्र हिस्सा ६०%) सर्वसाधारण (२४०२ १०४६) योजनेंतर्गत
३३-अर्थसहाय्य

**राज्य हिस्सा लेखाशिर्ष**

मागणी क्र.डी-३
२४०२, मृद व जलसंधारण
(००)(१०१) मृद सर्वेक्षण व चाचणी
(००)(१५) कृषि उन्नती योजना - मृद आरोग्य व्यवस्थापन-उपअभियान (केंद्र पुरस्कृत योजना)
(राज्य हिस्सा ४०%) (२४०२ अे ०१२) योजनेंतर्गत
३३-अर्थसहाय्य

३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे-

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनांनुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखापरिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

३) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे

मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

४) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक / तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांनी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस (PFMS) प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

५. सदर योजनेकरिता आयुक्तालय स्तरावर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तर जिल्हा स्तरावर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी योजनेचे नियंत्रण अधिकारी व त्यांचे कार्यालयातील लेखा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१६१/२०२०/व्यय-१, दि.३१.०८.२०२० अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार काढण्यात येत आहेत. तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं -२०२०/ प्र.क्र.६५/अर्थ ३, दिनांक ०४.०५.२०२० व दिनांक २६.०५.२०२० मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०२०१००९१७३००७२९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.10.09 17:31:55 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.

४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.